**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे इंदू मिल येथील आंतरराष्ट्रीय दर्जाचे भव्य स्मारकाच्या सुधारीत संकल्पनेनुसार पुतळयाची उंची वाढवून अंदाजित खर्चास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२०/सं.क्र.५२/नवि-०७,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १० सप्टेंबर, २०२०.

**प्रस्तावना :**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे आंतरराष्ट्रीय दर्जाचे भव्य स्मारक इंदू मिल क्रमांक ६ च्या जागेवर उभारण्यासंदर्भात मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाची विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून दिनांक १९ मार्च, २०१३ च्या अधिसूचनेद्वारे नियुक्ती करण्यात आली आहे.

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या आंतरराष्ट्रीय स्मारकाच्या उभारणीसंदर्भात मा. मुख्यमंत्री महोदयांच्या स्तरावर दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये मेसर्स शशी प्रभु ॲन्ड असोसिएटस यांची सल्लागार नियुक्तीस मान्यता देण्यात आली असून सदर सल्लागार नियुक्तीचा निर्णय दि. ३० सप्टेंबर २०१५ रोजी मा. मंत्रीमंडळास अवगत करण्यात आला आहे. भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या इंदू मिल क्रमांक ६ येथील भव्य स्मारकासाठी सुमारे रु.७६३.०५ कोटी सुधारीत अंदाजित खर्चास मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने दिनांक १२.०१.२०१८ च्या १४४ व्या बैठकीत ठराव क्रमांक १४४५ अन्वये मान्यता दिली होती. सदर स्मारकाच्या सुधारीत संकल्पनेनुसार मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या दिनांक ०७.०७.२०२० रोजीच्या १४९ व्या बैठकीत मान्यता दिल्याप्रमाणे रु.१०८९.९५ कोटी (ढोबळ अंदाजपत्रकीय खर्च) अपेक्षित आहे.

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे इंदू मिल, दादर, मुंबई येथील आंतरराष्ट्रीय दर्जाच्या भव्य स्मारकातील पुतळयाची उंची वाढवून पादपीठ ३० मीटर (१०० फूट) उंच व पुतळा १०६.६८ मीटर (३५० फूट) उंच अशी एकूण १३६.६८ मीटर (४५० फूट) उंची ठेवण्यास व मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने सादर केलेल्या सुधारीत संकल्पनेनुसारच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे आंतरराष्ट्रीय दर्जाचे इंदू मिल येथील भव्य स्मारकाच्या सुधारीत संकल्पनेनुसार बांधकाम करावयाच्या प्रकल्पास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

(१) भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे इंदू मिल येथील आंतरराष्ट्रीय दर्जाचे भव्य स्मारकातील पुतळयाची उंची वाढवून पादपीठ ३० मीटर (१०० फूट) उंच व पुतळा १०६.६८ मीटर (३५० फूट) उंच अशी एकूण १३६.६८ मीटर (४५० फूट) उंची ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(२) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या सुधारीत संकल्पनेनुसार सदर प्रकल्पाच्या अंदाजित खर्चास मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने प्रशासकीय मान्यता द्यावी.

(३) सदर कामाचा खर्च मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने करुन केलेल्या खर्चाची प्रतिपुर्तीबाबत शासनाकडे मागणी करावी.

(४) सदर आंतरराष्ट्रीय दर्जाच्या भव्य स्मारकाकरीता कार्यान्वयीन यंत्रणा म्हणून मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास कायम ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(५) सदर प्रकल्पाच्या खर्चाची प्रतिपुर्ती करण्यासाठीचा विभाग म्हणून सामाजिक न्याय विभागाकडून करण्यात येईल. त्यानुषंगाने लेखाशिर्ष उघडणे व इतर आवश्यक कार्यवाही ही सामजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने करावी.

(६) सदर स्मारकाच्या जलद कामकाजासाठी मा. मंत्री, सामाजिक न्याय व सामाजिक न्याय विभागाकडून संनियंत्रण करण्यात येईल.

३. सदरचा शासन निर्णय हा दि. १५.०१.२०२० रोजी मंत्रिमंडळाने दिलेली मान्यता, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने दि. १०.०८.२०२० रोजी दिलेली सहमती व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.१९१, दिनांक ०३.०९.२०२० अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००९१०१४४९२०३०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2020.09.10 17:16:48 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव.
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. मा. मंत्री (नगर विकास विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११. मा. मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२. मा. राज्यमंत्री (नगर विकास विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३. अपर मुख्य सचिव (गृह निर्माण) मंत्रालय, मुंबई.
१४. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१६. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

१७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१८. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१९. अपर मुख्य सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२०. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२१. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२२. प्रधान सचिव, पर्यावरण विभाग , मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२३. सचिव (सार्वजनिक बांधकाम विभाग), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२४. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२५. सचिव (विशेष प्रकल्प), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२६. सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२७. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
२८. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
२९. जिल्हाधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगरे/ठाणे.
३०. सह सचिव, नगररचना, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३१. संचालक, नगररचना, मध्यवर्ती प्रशासकीय इमारत, पुणे.
३२. उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३३. सहसंचालक, नगर रचना व मुल्य निर्धारण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
३४. कार्यासन अधिकारी (नवि-११/२१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३५. निवड नस्ती (नवि-७).